**उजनी प्रकल्पांतर्गत अहमदनगर जिल्हयातील कर्जत तालुक्यातील पुनर्वसित गावठाणामधील प्रशासकीय मान्यता प्राप्त नागरी सुविधा कामांसाठी निधी मंजुरीबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अर्थसं.२०१७/५५/प्र.क्र.१८/र-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २३/०३/२०१७

**वाचा -**

१) शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्र.आरपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१, दि.१.८.२००९
२) शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्र.आरपीए ०१११/प्र.क्र.१८/र-१, दि.२८.३.२०११
३) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अंर्थसं-२०१५/ प्र.क्र.८५/२०१३/ अर्थसंकल्प-३, दि.१७/०४/२०१५
४) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. अर्थसं.२०१३/प्र.क्र.५७/र-८, दि.२३/०८/२०१३
५) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. अर्थसं.२०१५/३०६/प्र.क्र.४८/र-८, दि.१४/०१/२०१६
६) अधीक्षक अभियता, भीमा कालवा मंडळ, सोलापूर यांचे पत्र क्र. भीकामं/प्रशा.२/ पुनर्वसन/ ५५८४/ २०१६ दि. ०८/१२/२०१६
७) अधिक्षक अभियंता, भीमा कालवा मंडळ, सोलापूर यांचे पत्र क्र. भीकामं/लेखा/६३०/सन २०१७ दि. ०७/०२/२०१७

**प्रस्तावना -**

उजनी प्रकल्प जि. सोलापूर अंतर्गत अहमदनगर जिल्हयातील कर्जत तालुक्यातील पुनर्वसित गावांमधील नागरी सुविधा कामांना संदर्भाधीन क्र. ४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर प्रशासकीय मान्यता आदेशानुसार प्रगतीपथावर असलेल्या नागरी सुविधा कामांची प्रलंबित देयके अदा करण्यासाठी रु. १०८.७६ लक्ष चा निधी मागणी प्रस्ताव अधिक्षक अभियंता, भीमा कालवा मंडळ, सोलापूर यांनी दि. ०७/०२/२०१७ रोजीच्या पत्रान्वये शासनास सादर केला होता.

२. यासंदर्भात, उजनी प्रकल्पांतर्गत सोलापूर, पुणे तसेच अहमदनगर जिल्हयातील पुनर्वसित गावठाणांमधील प्रशासकीय मान्यता प्रदान नागरी सुविधा कामांकरिता प्रकल्पयंत्रणेने सादर केलेल्या प्रस्तावानुसार पुर्ण झालेल्या/प्रगतीपथावर असलेल्या नागरी सुविधा कामांसाठी सन २०१५-२०१६ या वित्तीय वर्षात संदर्भ क्र. ५ नुसार एकत्रितरीत्या रु. २३९.३५ लक्ष एवढा निधी उपलब्ध करुन देण्यात आला होता. त्यामध्ये अहमदनगर जिल्हयातील नागरी सुविधा कामांवरील रु. ५.४३ लक्ष निधीचा समावेश होता. तथापि, प्रशासकीय मान्यता प्राप्त नागरी सुविधा कामांपैकी मौजे खेड ते गणेशवाडी पोहोचरस्ता डांबरीकरण करणे व मोरी बांधकाम करणे (किमी १ ते ६) या कामांमध्ये प्रकल्पयंत्रणेने कार्यक्षेत्रिय आवश्यकता तसेच ग्रामस्थ यांच्या मागणीनुसार नवीन बाबींचा समावेश करुन, कामांची अंदाजपत्रके सन २०१३-२०१४ च्या दरसूचीनुसार सुधारित केली असल्याने सुधारित प्रशासकीय मान्यता प्रस्ताव शासनास सादर केला असून, सदर प्रस्ताव कार्यवाहीअंतर्गत आहे. याबाबत, प्रकल्पयंत्रणेने मुळ प्रशासकीय मान्यता किंमत मर्यादेत नमूद नागरी सुविधा कामे केलेली असल्याने, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग-पहिला, उपविभाग-तीन परिच्छेद २७

(अ) नुसार योजनेला किंवा प्रस्तावाला सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करताना मुळ मंजूर अंदाजापेक्षा अधिक रक्कम खर्च व्हायच्या आत सुधारित खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात यावी ही अट लक्षात घेता, मौजे खेड ते गणेशवाडी पोहोचरस्ता डांबरीकरण व मोरी बांधकाम करणे या नागरी सुविधा कामांना सुधारित प्रशासकीय मान्यता प्राप्त झाल्याशिवाय मुळ प्रशासकीय मान्यता रकमेपेक्षा जास्त निधी खर्च होणार नाही या अटीवर निधी उपलब्ध करुन देण्याचे शासनाच्या विचाराधिन होते.

**शासन निर्णय -**

तदनुषंगाने, उजनी प्रकल्पांतर्गत अहमदनगर जिल्हयातील कर्जत तालुक्यातील पुनर्वसित गावांमधील प्रगतीपथावरील नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी मागणी करण्यात आलेला एकूण रू. १०८.७६ लक्ष निधीस सन २०१६-१७ या चालू वित्तीय वर्षात खर्च करण्यास खालील अटीच्या अधीन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे.

**२. तदनुसार, शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र.२०१३/ प्र.क्र.३०/१३/ विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल २०१५ अनुसार वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र.२७ (२) (अ) अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारांनुसार, उजनी प्रकल्पांतर्गत अहमदनगर जिल्हयातील कर्जत तालुक्यातील पुनर्वसित गावांमधील प्रगतीपथावर असलेल्या नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी योजनेंतर्गत " मागणी क्रमांक सी, १०-४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००) (०३) इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (योजनांतर्गत) (दत्तमत)" या लेखाशीर्षाखाली सन २०१६-२०१७ या वित्तीय वर्षात BDS प्रणालीवर उपलब्ध तरतूदीतून रु. १०८.७६ लक्ष (रुपये एकशे आठ लक्ष शहात्तर हजार फक्त ) एवढा निधी विभागीय आयुक्त, पुणे यांना खालील अटींच्या अधिन राहून उपलब्ध करुन देण्यात येत आहे.**

**वित्तीय शिस्तीच्या अनुषंगाने सर्व संबंधितांनी खालील सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.**

१) विभागीय आयुक्त, पुणे यांनी त्यांना या आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित नियंत्रण अधिकारी म्हणून संबंधित अधिक्षक अभियंता, भीमा कालवा मंडळ, सोलापूर यांचेकडे अर्थसंकल्प वितरणप्रणाली ( BDS ) द्वारे तात्काळ वितरित करावा.

२) नागरी सुविधा कामांसाठी वितरीत केलेला सदरचा निधी अधिक्षक अभियंता, भीमा कालवा मंडळ, सोलापूर यांनी विभागीय आयुक्त, पुणे विभाग यांचेकडून प्राप्त होताच संबंधित कार्यकारी अभियंता, उजनी कालवा विभाग क्र. ८, सोलापूर यांचेकडे पतपत्र ( LOC ) द्वारे विनाविलंब वितरित करावा.

३) नागरी सुविधा कामांसाठी शासनाच्या पुनर्वसन विभागाकडून निधी उपलब्ध करुन दिला जात असल्याने नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी संबंधित पाटबंधारे विकास महामंडळाकडून कोणतीही परवानगी/मंजुरी घेण्याची आवश्यकता नाही.

४) या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेला व प्राप्त झालेला निधी मंजूर नागरी सुविधा कामांवरच खर्च करण्यात यावा, तसेच सदर नागरी सुविधा कामांना सुधारित प्रशासकीय मान्यता प्राप्त झाल्याशिवाय मुळ प्रशासकीय मान्यता रकमेपेक्षा जास्त निधी खर्च होणार नाही यांची कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

५) कार्यकारी अभियंता, उजनी कालवा विभाग क्र. ८, सोलापूर यांनी या आदेशान्वये मंजूर केलेला निधी प्राप्त होताच नागरी सुविधा कामांची प्रलंबित देयके तात्काळ अदा करावीत, तदनुषंगाने कार्यपूर्ती अहवाल शासन, विभागीय आयुक्त, पुणे तसेच संबंधित जिल्हाधिकारी यांना सत्वर सादर करावा.

६) मंजूर निधी शासनाच्या पुर्वमान्यतेशिवाय अन्य कामांवर खर्च होणार नाही याची संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी दक्षता घ्यावी.

७) सदरच्या आदेशातील नमूद मुख्यलेखाशीर्ष मागणी क्र.सी-१०, ४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च(००)(०३)इतर प्रकल्प,५३मोठी बांधकामे(४७०१-एच-७२७) (योजनांतर्गत) (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत कोणताही निधी शिल्लक रहाणार नाही अथवा सदर आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित यंत्रणेच्या कोणत्याही Operational Bank Account /PLA (स्वीय प्रपंची खाते ) मध्ये जमा करून ठेवण्यात येणार नाही, याची संबंधित यंत्रणेचे अधिक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

८) सदरच्या आदेशातील नमूद मुख्यलेखाशीर्ष मागणी क्र.सी-१०, ४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००)(०३)इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (योजनांतर्गत) (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत एक वर्षापूर्वीचे कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही, याची संबंधित यंत्रणेचे अधिक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

९) मुख्यलेखाशीर्ष मागणी क्र. सी-१०, ४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००) (०३) इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (योजनांतर्गत) (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत संबंधित संनियत्रण अधिकारी यांनी होणाऱ्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवून शासनाच्या प्रचलित लेखा पध्दतीनुसार ते महालेखापाल यांना सादर करावेत. तद्नुषंगाने या लेखाशीर्षाखाली होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे इत्यादि कामे संबंधितांनी प्रचलित पध्दतीप्रमाणे करावीत.

१०) यासंदर्भातील खर्च विवरणपत्रे/ अहवाल शासनास न चुकता सादर करण्यात यावीत. वरील निधीसंबंधित खर्च ताळमेळाची विवरणपत्रे महालेखापाल कार्यालयाच्या Reconcillation Slip सह शासनास न चुकता सादर करावीत.

११) संबंधित अधिक्षक अभियंता व संबंधित कार्यकारी अभियंता यांनी या आदेशान्वये वितरीत निधीचे उपयोजन प्रमाणपत्र Utilisation Certificate महालेखापाल कार्यालय, संबंधित जिल्हाधिकारी/ विभागीय आयुक्त/शासनास तातडीने सादर करावीत.

१२) यासंदर्भातील लेखाशीर्षाखाली चालू वित्तीय वर्ष सन २०१६-२०१७ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या निधीच्या अनुषंगाने खर्चाचा विनियोजन लेखा संबधितांनी विहित कालावधीत शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२३१२२१०६३९१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Pravin R Mundhe

Digitally signed by Pravin R Mundhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pravin R Mundhe
Date: 2017.03.23 12:23:25 +05'30'

**( प्रविण रा. मुंढे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी ( पुनर्वसन ), पुणे विभाग,

२. उप आयुक्त ( पुनर्वसन ), पुणे विभाग

३. जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उप संचालक, अहमदनगर
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)
५. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)
६. अधिक्षक अभियंता, भीमा कालावा मंडळ, सोलापूर
७. कार्यकारी अभियंता, उजनी कालवा विभाग क्र. ८, सोलापूर
८. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर
९. वित्त विभाग, कार्यासन व्यय-१०, अर्थसंकल्प-३, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. जलसंपदा विभाग / मोप्र-२, मंत्रालय, मुंबई-३२.
११. नियोजन विभाग, कार्यासन १४७५, मंत्रालय, मुंबई ३२.
१२. महसूल व वन विभाग, कक्ष अधिकारी ब-१, मंत्रालय, मुंबई ३२.
१३. महसूल व वन विभाग, पी.ए.सी. कार्यासन, मंत्रालय, मुंबई ३२.
१४. निवडनस्ती र-८, कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

***

**शासन निर्णय क्र. अर्थसं-२०१७/५५/प्र.क्र.१८/र-८, दि. २३/०३/२०१७ सोबतचे विवरणपत्र**

**उजनी प्रकल्पांतर्गत अहमदनगर जिल्हयातील कर्जत तालुक्यातील प्रगतीपथावर असलेल्या नागरी सुविधा कामांसाठी वितरीत निधीचा तपशील.**

| अ क्र | पुनर्वसित गावाचे नाव | नागरी सुविधा काम | वितरीत निधी (रु. लक्ष) |
|---|---|---|---|
| १) | गणेशावाडी | खेड ते गणेशावाडी पोहोचरस्त्याचे डांबरीकरण करणे किमी १ व त्यावरील मोरी बांधकाम करणे | ५१.४२ |
| २) | गणेशावाडी | खेड ते गणेशावाडी पोहोचरस्त्याचे डांबरीकरण करणे किमी २ व त्यावरील मोरी बांधकाम करणे | २९.८९ |
| ३) | गणेशावाडी | खेड ते गणेशावाडी पोहोचरस्त्याचे डांबरीकरण करणे किमी ३ व त्यावरील मोरी बांधकाम करणे | २७.४५ |
| | | **एकूण** | **१०८.७६** |

Pravin R Mundhe

Digitally signed by Pravin R Mundhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pravin R Mundhe
Date: 2017.03.23 12:25:23 +05'30'

**(प्रविण रा. मुंढे)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**